जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग, मदत व पुनर्वसन**
**शासन निर्णय क्रमांक :-आव्यप्र-२०२४/प्र.क्र.९३/आव्यप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००० ३२.
दिनांक - ११ जुलै, २०२४

**प्रस्तावना:-**

आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ च्या तरतूदीनुसार मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे. -आपत्तीप्रसंगी प्रतिसाद देणाऱ्या यंत्रणांचे सक्षमीकरण करणे॰ ही प्राधिकरणाची मुख्य जबाबदारी आहे. तसेच या अधिनियमाच्या कलम २२ व २४ मध्ये राज्य कार्यकारी समितीच्या जबाबदाऱ्या नमूद केल्या आहेत. यामध्ये आपत्तीला सक्षमपणे तोंड देण्याकरिता करावयाच्या उपाय योजना व कार्ये नमूद करण्यात आली आहेत. त्याचप्रमाणे दि. १९ नोव्हेंबर, २०२० रोजीच्या केंद्रीय गृह मंत्रालयाच्या पत्रान्वये आपत्तीला योग्य प्रतिसाद देण्यासाठी राज्य आपत्ती धोके व्यवस्थापन निधी (SDRMF) या नावाने राज्य आपत्ती प्रतिसाद निधीपैकी क्षमता बांधणी तसेच सौम्यिकरणासाठी स्वतंत्र निधी राखीव ठेवण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत.

उपरोक्त संदर्भानुसार आपत्ती व्यवस्थापनांतर्गत आपत्तीमुळे निर्माण होणारे धोके व नुकसान कमी करण्याकरिता उचित प्रतिबंधात्मक उपाययोजना, सौम्यीकरण उपाय, पूर्वतयारी व क्षमता बांधणी, प्रशिक्षण व जनजागृती, शोध व बचाव कार्य, आपत्ती व्यवस्थापना संबंधित साहित्य खरेदी/ दुरुस्ती या करिता राज्यातील जिल्ह्यांना निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ च्या कलम ३१ प्रमाणे जिल्हा आपत्ती व्यवस्थापन आराखडा तयार करुन त्यानुषंगाने आपत्ती व्यवस्थापनांतर्गत आपत्तीमुळे निर्माण होणारे धोके व नुकसान कमी करण्याकरिता उचित प्रतिबंधात्मक उपाययोजना, सौम्यीकरण उपाय, पूर्वतयारी व क्षमता बांधणी, प्रशिक्षण व जनजागृती, शोध व बचाव कार्य, आपत्ती व्यवस्थापना संबंधित साहित्य खरेदी/ दुरुस्ती या करिता जिल्हांना निधी उपलब्ध करून देण्यात आला होता.ज्या जिल्हयांनी त्यांना देण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे अशा जिल्हयांना सन २०२४-२५ या वर्षाकरिता निधी वितरीत करण्यात येत आहे. त्यानुसार पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मुंबई शहर या जिल्ह्याला ५ लक्ष व इतर १८ जिल्ह्यांना प्रत्येकी ३० लक्ष याप्रमाणे एकूण १९ जिल्हांना **रू.५,४५,००,०००/- मात्र (अक्षरी रू. पाच कोटी पंचेचाळीस लक्ष मात्र)** एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना कोषागारातून काढून खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. विभागीय आयुक्त यांनी पुढील तक्त्यानुसार संबंधित जिल्ह्यास BDS वर निधी वितरित करावा.

| अ.क्र | जिल्हा | वितरीत निधी (रू. लक्ष) |
|---|---|---|
| १ | मुंबई शहर | ५ |
| २ | सांगली | ३० |
| ३ | नाशिक | ३० |

| | | |
|---|---|---|
| ४ | नंदुरबार | ३० |
| ५ | औरंगाबाद | ३० |
| ६ | बीड | ३० |
| ७ | जालना | ३० |
| ८ | परभणी | ३० |
| ९ | लातूर | ३० |
| १० | अमरावती | ३० |
| ११ | अकोला | ३० |
| १२ | बुलढाणा | ३० |
| १३ | वाशीम | ३० |
| १४ | यवतमाळ | ३० |
| १५ | वर्धा | ३० |
| १६ | चंद्रपूर | ३० |
| १७ | भंडारा | ३० |
| १८ | गोंदिया | ३० |
| १९ | गडचिरोली | ३० |
| **एकूण** | | **५.४५ कोटी** |

५. जिल्ह्यांना वितरीत करण्यात आलेला निधी आपत्ती व्यवस्थापनासाठी वितरीत करण्यात आला असल्याने त्याचा विनियोग **या विभागाच्या दिनांक. ११/०७/२०२४ रोजीच्या, शासन निर्णय क्रमांक: आव्यप्र-२०२४ /प्र.क्र.९३/आव्यप्र-१ याच्या अधीन राहून करण्यात यावा.**

६. या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६ २२४५, (९१) (०१) पुर्वतयारी व क्षमताबांधणी (वित्त आयोग) (अनिवार्य) (२२४५-४१८८), ३१ सहाय्यक अनुदाने (सशर्त) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता वितरीत केलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा. सदर शासन आदेशातील रक्कम विभागीय आयुक्तांमार्फत जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना BDS वर वितरित करण्यात येईल.

७. सदर आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थस-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि.१ एप्रिल २०२४ अन्वये केलेल्या निधी वितरणाच्या आदेशानूसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०७१११७००२०६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशनुसार व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.07.11 17:11:16 +05'30'

**( हितेंद्र दुफारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल,(महाराष्ट्र-) मुंबई/नागपूर
२. सर्व विभागीय आयुक्त

३. वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व जिल्हाधिकारी
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. कक्ष अधिकारी, कार्यासन म-११, मदत व पुनर्वसन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, (व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती/ आव्यप्र-१.